# त्रिपुरवध

लेखक-महाराष्ट्रीय

प्रतिवर्षीं कार्तिकी पूर्णिमेला त्रिपुरवधानिमित्त म्हणून आपण दीपोत्सव करीत असतों, व त्या निमित्तानें त्रिपुरवधाची कथा सर्वांना विदित आहे. त्या दिवशीं शंकरांनीं त्रिपुर नामक असुराचा एक बाण मारून वध केला असें कथेचें सामान्य स्वरूप आहे. राक्षस म्हटला म्हणजे त्यानें प्रजेला उपद्रव द्यावयाचा व प्रजा विष्णु वा शंकर यांसारख्या कोणा तरी देवाला शरण जावयाची व त्यावरून त्यांनीं अवतार धारण करून त्या राक्षसाचा वध करावयाचा अशा प्रकारचें कथेचें स्वरूप सर्व अवतारांचे कथांचे बाबींत आहे असें म्हणावयाला चिंता नाहीं. कोणा तरी देवतेच्या कृपेनें अशा राक्षसाचे अंगीं कांहीं तरी अलौकिक शक्ति असावयाची व त्यामुळें सामान्य जनांना त्यापासून स्वत:चें रक्षण होणें दुर्घट व्हावयाचें हीहि एक अशा कथांमध्यें ठरलेली गोष्ट आहे. त्रिपुरवधाचे कथेंत हे सर्व प्रकार

आहेत. तथापि या कथेंत आणखी कांहीं विशेष आहे. त्रिपुर या नांवाचा कोणी स्वतंत्र असुर नसून अंतरिक्षांत अखंड फिरत राहणारीं तीं तीन पुरें होतीं व त्यांलाच त्रिपुर ही अन्वर्थक संज्ञा होती असें त्याचें वर्णन तेथें केलेलें आहे. अंतरिक्षांत चक्राकार व अखंड होत असलेल्या भ्रमण्यांचे अर्थबोधरूप हीं पुरें म्हणजे तीन प्रकारचीं वर्षें असावीं अशी कल्पना झाली व तिचें दिग्दर्शन आमच्या "आग्रहायणी" वरील प्रबंधाचे प्रारंभीं आम्हीं केलेलें आहे; व आमची ही कल्पना आपणांस पटल्याचें कित्येक वाचकांनीं आम्हांला लिहून कळविलें आहे. हीं तीन प्रकारचीं वर्षें कोणतीं असावींत या विषयींची आमची कल्पनाहि तेथें माडली आहे. पण हा काळ कोणता असावा या विषयीं चर्चा तेथें तो विषय प्रस्तुत नसल्यामुळें केलेली नाहीं. तथापि हा विषय महत्त्वाचा व आमच्या आग्रहायणींतील कल्पनेला पोषक असल्यामुळें त्यावर प्रस्तुत चार शब्द लिहावयाचें योजिलें आहे.

त्रिपुरवधाविषयींच्या आमच्या कल्पनेवरून उघड दिसतें कीं, त्रिपुरवध म्हणजे प्राचीनकाळीं करण्यांत आलेली पंचांगाची सुधारणा होय. पंचांग हा शब्द आज

सर्वांना परिचित असा एक सोयीचा म्हणून योजीत आहों. वास्तविक फार प्राचीनकाळीं ज्योतिर्विषयक पांच अंगांतील किती ज्ञात होतीं व पुढें हें ज्ञान वाढतां वाढतां पांचहि अंगांचें ज्ञान पूर्णतया कधीं झालें याविषयीं निश्चित अनुमान करण्यासारखीं साधनें अजून उपलब्ध नाहींत; यासाठीं प्राचीन कालासंबंधीं बोलतांना पंचांग शब्द योजितां येईल का नाहीं याची आम्हांला शंका आहे. तेव्हां प्राचीन कालाचें एक कालमापक इतकाच अर्थ येथें पंचांग शब्दानें विवक्षित आहे असें समजावें. पंचांगांतील ही सुधारणा म्हणजे तीन प्रकारांचीं पंचांगें समाजांत चालू होतीं तीं बंद करण्यांत येऊन वर्ष मोजण्याची नवीन प्रथा चालू करण्यांत आली ही होय. अर्थात् नवीन पद्धतीचे वर्षाचा प्रारंभ कार्तिकी पूर्णिमेला झाला असें दिसतें. दीपोत्सव हा वर्षारंभाचे उत्सवाचा द्योतक होय. प्राचीनकालीं कालगणना दिवसावर नसून रात्रीवर करीत असत हें आम्हीं आग्रहायणीमध्यें प्रमाणासह दाखविलें आहे. व त्या कालांतील या प्रचारास अनुसरून हा उत्सव कार्तिकी पूर्णिमेला रात्रीचे प्रारंभीं करण्याची प्रथा आहे.

नवीन पद्धतीचे वर्षाची योजना श्री शंकरांनीं केली असें

त्रिपुरवधाचे कथेवरून दिसतें; अर्थात् शंकराचे त्याशीं जनकत्वाचें नातें आलें. कार्तिकेय याचें नांव शंकरांचा पुत्र म्हणून प्रसिद्ध आहे. त्याचे नांवाचा संग्रह अमरसिंहानें पुढील श्लोकांत केला आहे.

पार्वतीनन्दनः स्कन्दः सेनानीरग्निभूर्गुहः ।
बाहुलेयस्तारकजिद् विशाखः शिखिवाहनः
षाण्मातुरः शक्तिधरः कुमारः क्रौंचवाहनः ॥

यांमध्यें संवत्सरवाचक नांवें किती मिळतात तें आतां पाहूं. नूतन वर्षाचा प्रारंभ कृत्तिका नक्षत्रावर होत असल्यानें त्याला कार्तिकेय हें नांव मिळणें साहजिक दिसतें. बहुला हें कृत्तिकांचें नामांतर होय. तेव्हां बाहुलेय हा कार्तिकेयाचा पर्याय झाला हें उघड आहे. कला काष्ठादि जीं लहान लहान कालसाधनें आहेत त्यांतून वर्ष हें मोठें कालमापन असल्यानें त्याला श्रेष्ठत्वदर्शक असें सेनानी किंवा महासेन असें नांव मिळालें यांत आश्चर्य नाहीं. सहा ऋतु हीं संवत्सराचीं सहा मुलें म्हणून त्याला षडानन असें नांव मिळालें. षडानन आणि षाण्मातुर यांमध्यें षट्शब्द असल्यामुळें दोहोंचें सादृश्य लक्षांत येतें. पण षाण्मातुराचा खरोखर पाहिलें तर कार्तिकेयाशीं

संबंध आहे. कृत्तिकांमध्यें डोळ्यांना दिसणारीं नक्षत्रें सहा आहेत. व ती संख्या लक्षांत घेऊन त्याला षाण्मातुर हें नांव मिळालेलें दिसतें. वर्ष हा कालखंड असा आहे कीं तो पूर्वापर कालाशीं जोडला जात असला तरी त्यांचा सांधा किंवा त्याला निराळें नांव मिळत नाहीं किंवा सांधा न जोडला जातां अलगहि राहत नाहीं. यामुळें त्याचें वयोमान निरंतर एक वर्षाचें आहे तसें आहे; म्हणून त्याला निरंतर कुमार म्हटला आहे; आणि अशा प्रकारें त्याला यौवन कधींच प्राप्त होत नसल्यामुळें त्याचा विवाह कोणाशीं कसा होणार ? त्याच्या या विवाहपराङ्मुखास्तव त्याला स्वामी असें संन्यासआश्रमदर्शक नांवहि केव्हां केव्हां देण्यांत येतें. याचीच अतिव्याप्ति होऊन स्त्रियांनीं त्याचें नांव किंवा त्याचे मूर्तीचें दर्शन घेतां नये येथपर्यंत त्याची मर्यादा वाढत गेली. या अर्थाचें मूळ तो सदोदित कुमार असतो हें होय; अग्नि ही कृत्तिकांची देवता व म्हणून त्याला अग्निभू असें म्हणतात. पण त्यामध्यें कार्तिकेयाहून वेगळा अर्थ विवक्षित नाहीं. विवाह न झाल्यामुळें त्याला संतति-विस्तार नाहीं; अर्थात् शाखाविरहित वृक्षाप्रमाणें तो आहे म्हणून त्याला विशाख हें

अन्वर्थक नांव मिळालें. षडानन नांवामध्यें सहा ऋतु हीं त्याचीं मुखें मानिलेलीं आहेत. शतपथ ब्राह्मणामध्यें एके स्थळीं ऋतूंना द्वारांचीं उपमा दिलेली आहे (१।६।१।१९) व हीं द्वारें जाणणें अर्थात् ऋतूंचा प्रारंभ कधीं होतो हें निश्चित कळणें कठीण असल्याचें ध्वनित केलें आहे. याला मुखें सहा पण अशा रीतीनें तीं दुर्ज्ञेय असल्यामुळें त्याला गुह हें नांव प्राप्त झालें असावें एकंदरीत कार्तिकेयाचीं बहुतेक नांवें संवत्सरवाचक दिसत आहेत. तारकजित् सारखीं कांहीं नांवें स्वतंत्र असलीं तरी त्यांविषयीं स्वतंत्र कथा आहेत व तन्निमित्तक तीं असल्यामुळें तीं संवत्सर वाचक आहेत असें आम्हीं म्हणत नाहीं. व इतर नांवांची संवत्सरवाचकता दाखविल्यावर एकाद्या नांवांतील अर्थभेदाला तादृश महत्त्वही नाहीं. पार्वतीनंदन हें नांव असेंच स्वतंत्र आहे. वास्तविक पार्वती ही त्याची जन्मदात्री नव्हे. शंकर त्याचे जनक व पार्वती ही त्यांची स्त्री म्हणून तिला मातृपद प्राप्त झालें इतकेंच.

या वर्षयोजनेचा काळ कोणता याचा विचार यापुढें येतो तिकडे आतां वळूं. एका वर्षाची समाप्ति झाली कीं लागलीच दुसऱ्याचा प्रारंभ होतो याचा अनुभव आपणाला

नित्य असल्यामुळें या प्रश्नाचें महत्त्व आपणाला कळत नाहीं; पण हा प्रश्न दिसायला वाटतो तितका सोपा नाहीं. सध्यां आपण चांद्रमानानें वर्ष मोजतों. पण अधिकमास धरून सौरमानाशीं मेळ ठेवीत असतों, व ही प्रथा दोन सहस्र वर्षांपेक्षां न्यून नाहीं इतका काळ चालू आहे. या पूर्वी पांच वर्षांत दोन अधिक मास व ते ठरीव धरण्याची पद्धति प्रचारांत होती. हें लगधाचार्यांच्या वेदांगज्योतिषावरून सर्वांला विज्ञात आहे. या पूर्वी निरनिराळ्या काळीं निरनिराळ्या पद्धति प्रचारांत होत्या; पण त्या सर्वांचा हेतु पाहिला तर "वर्षाचा ऋतूंशीं मेळ जमवून देणें" हा एकच होता यांत शंका नाहीं. केवळ चांद्रमान धरून हें साधत नाहीं व सौराचें सोडून चालत नाहीं. आणि केवळ सौरमान मोजावयाला सोयीचें नाहीं. निरनिराळ्या पद्धतींचे अनुभव घेतां घेतां सध्यांची पद्धति सोयीची म्हणून प्रचारांत आली आहे. ऋतुचक्र तर सौरमानावरहि अवलंबून नाहीं; तथापि सौ. वर्ष व ऋतूंचें वर्ष-ज्याला सांपातिक वर्ष म्हणतात-यामध्यें अंतर अत्यल्प आहे व म्हणून सौरमानाशीं मेळ घेण्याची प्रथा प्रचारांत आहे. अर्थात् या वर्षयोजनेचा उपक्रम कधीं झाला हें पहा-

वयाचें म्हणजे हें सर्व लक्षांत घेणें अवश्य आहे. सौर-वर्षाची योजना करावयाची म्हणजे त्याचे निसर्गतः चार भाग पडतात. त्यांतील कोणत्या तरी भागाचा प्रारंभ निवडून तेथें वर्षारंभ करावा लागेल हें उघड आहे. हे चार भाग म्हणजे अहोरात्रमान सारखें होणें-हें वर्षांतून दोन वेळां होतें-म्हणून दोन भाग होतात; यांलाच वसंत संपात व शरत्संपात अशीं नांवें आहेत. यांचे पुनः दोन भाग पडतात. एक दिवस सर्वांत मोठा होऊन व दुसरा रात्रि सर्वांत मोठी होऊन. यांतील कोणत्या तरी दिवसावर प्रारंभ करून वरील वर्षयोजना चालू झाली असावी हें उघड आहे. यांमध्यें आम्हाला आधार मिळाला असेल तर तो कृत्तिकानक्षत्राचा होय. दुसरा आधार त्या दिवशीं चंद्र पूर्ण होता म्हणजे पूर्णिमा होती हा. म्हणजे त्या दिवशीं सूर्य विशाखांवर असणार हें उघड आहे. त्रिपुरवधाचे कथेंत तीन पुरें एका रेषेंत येण्याची अट विशेष महत्त्वाची आहे. एके रेषेंत म्हणजे एके स्थळीं नव्हे. व हें पूर्णिमेच्या दिवशीं साधतें. संध्याकाळीं पूर्वेला कृत्तिका व पूर्णचंद्राचा उदय व त्याच वेळीं पश्चिमेकडे विशाखा व सूर्य यांचा अस्त हीं समोरासमोर

पहावयाला मिळतात. त्यावेळीं तीन प्रकारचे वर्षारंभ एकत्र आले होते.

नक्षत्रमान मानणारे कृत्तिकांवर; चांद्रमान मानणारे कार्तिकी पूर्णिमेवर वर्षारंभ करीत असले पाहिजेत. सौरमानाचा वर्षारंभ याहून महत्त्वाचा आहे; व त्यावर कालनिर्णय अवलंबून आहे. येथें कृत्तिका नक्षत्र सर्वांचें अधिष्ठान आहे. सौरमानाचा वर्षारंभ नक्षत्रावर व्हावयाचा म्हणजे सूर्य त्या नक्षत्रीं असतां व्हावा हें सरळ आहे. येथें कृत्तिकांवर सूर्य नसला तरी तो समोरासमोर येत आहे. म्हणजे तेथें अयनारंभ होणें संभवनीय आहे व अयनारंभाला वर्षारंभासारखें महत्त्व आहे. कारण सौरमानाचा वर्षारंभ कोणत्या तरी अयनावरच व्हावयाचा. विषुवदिनाचें महत्त्व सध्यां आपणांला वाटतें. पण असे दिवस वर्षांतून दोन येत असल्यामुळें वर्षारंभासाठीं त्यामध्यें विवेक करावा लागून अनवस्था उत्पन्न होते व विषुवदिन म्हणजेच मध्यदिवस असा अर्थ होत असल्यास पुढें त्याचें स्थान कोणत्याहि वर्षाचे मध्यें असणें योग्य आहे. तेव्हां कृत्तिकांवर सूर्य असतां त्यावेळीं वर्षारंभ होत असे व अयनारंभ विशाखांवर होत असे; आणि

या अयनारंभाचे वेळींच कृत्तिका पूर्णिमेचा योग येतो. अशा रीतीनें दोन वर्षारंभ व सौरमानाचा वर्षारंभ एकच असल्याचा संधि साधून तेथें वर्षारंभ मानण्याची योजना शंकरानीं केली.

वसंत हा ऋतूंमध्यें प्रथम म्हणून वसंत संपातीं सूर्य असतां वर्षारंभ पुढील काळीं मानूं लागले व कृत्तिकांवर वसंत संपात असल्याचा काळ जर यासाठीं येथें घेतला तर तें संभवनीय दिसत नाहीं. कारण कृत्तिकांवर वसंत संपात असण्याचा काळ शकपूर्व २५०० चे सुमारें येतो. त्रिपुरवधाचा उत्सव याच्याहून प्राचीन आहे. तर मग हा वर्षारंभ कोणत्या निमित्तानें समजावा ? कार्तिकेयाचीं नांवें पाहून आपण तीं संवत्सरवाचक असल्याचें ठरविलें आहे. त्यामध्यें " शिखिवाहन " म्हणून एक नांव असून त्याविषयीं आपण विचार केलेला नाहीं. शिखी म्हणजे मोर. शिखिवाहन म्हणजे मोरावर बसलेला. मेघ व मोर यांमधील सख्य आपणाला विदित आहे. यावरून येथें त्या शब्दानें पावसाळा विवक्षित दिसतो. म्हणजे संवत्सराचें आगमन मोरावर बसून व्हावयाचें, अर्थात् वाहनाला आनंददायक मेघ त्यावेळीं आकाशांत असाव-

याचे व क्रमानें ते पाठीं लागावयाचें हें उघड आहे. याचा अर्थ असा कीं, वर्षारंभ पावसाबरोबर व्हावयाचा. वर्षारंभ या शब्दाचा सरळ अर्थहि वृष्टीचा प्रारंभ असा आहे. प्राचीन काळीं वृष्टीचे प्रारंभाबरोबर वर्षारंभ धरीत असत, व तो नैसर्गिक कसा आहे या विषयीं आमचे "आग्रहायणी" या प्रबंधामध्यें विस्तृत चर्चा केली असून त्याविषयीं वैदिक प्रमाणें दिलीं आहेत. कृत्तिकांवरील वर्षारंभाचा आपल्या पुढील प्रश्न प्राचीन काळचा आहे व यासाठीं त्याचा काळ ठरवावयाचा म्हणजे कृत्तिकांवर वृष्टीचा प्रारंभ केव्हां होत असे हें पाहणें भाग आहे. आमचे "आग्रहायणी" प्रबंधामध्यें आर्द्रांवर वृष्टीचे योगाचा पाया धरून त्यावरून मृगावर वृष्टियोग केव्हां होत असे याची चर्चा केली आहे व तो काल शकपूर्व २०००० वीस सहस्र वर्षांचा ठरविला आहे. मृगांवरून वृष्टियोग क्रमानें पाठीं येत येत कृत्तिकांवर यावयाचा म्हणजे मध्यंतरीं सुमारें १॥ दीड सहस्र वर्षें जावीं लागतील. म्हणजे स्थूल मानानें हा काळ शकपूर्व १८॥ साडे अठरा सहस्र वर्षें इतका येईल. कृत्तिकांवर त्यावेळीं सूर्य आला असतां दिनमान फार

मोठें होऊन वर्षाला प्रारंभ होत असे. पुढें विशाखावर रात्रि मोठी होणें क्रमप्राप्त होय. हाच त्रिपुरीचे उत्सवाचा किंवा नव्या वर्षारंभाचा दिवस होय. तैत्तिरीय ब्राह्मणा (३।१।४) मध्यें कृत्तिकांतील सात नक्षत्रांचीं नांवें पुढील प्रमाणें दिलीं आहेत—

अम्बायै स्वाहा। दुलायै स्वाहा। नितत्न्यै स्वाहा
ऽभ्रयन्त्यै स्वाहा॥

मेघयन्त्यै स्वाहा। वर्षयन्त्यै स्वाहा।
चुपुणिकायै स्वाहा॥

यांतील ४।५ व ६ हीं नांवें उघड उघड वृष्टिवाचक आहेत. तैत्तिरीय संहितेंत त्यांचा निर्देश असला तरी तीं त्यावेळीं नव्यानें बनवून दिलेलीं नाहींत. परंपरया ज्ञात असलेल्या नावाची ती नोंद आहे. तैत्तिरीय ब्राह्मणाचा काल येथें विचारांत घेण्याचें कारण नाहीं. शिवाय कृत्तिकांवर पर्जन्यारंभ योग शकपूर्व १८॥ साडेअठरा सहस्र वर्षे या काळीं आला आणि पुनः यावयाचा तो पांच सातशें वर्षांनीं येईल. मधील काळांत हा योगच संभवत नाहीं. अभ्रयंती, मेघयंती, वर्षयंती यांसारखीं नांवें चीचुचेंला सारखीं अर्थहीन आहेत असें म्हणतां

येत नाहीं. त्यांना अर्थ आहे आणि केव्हां तरी तो त्या नांवांत व्यक्त होत असला पाहिजे आणि नाम करणारीं माणसें बाहेर प्रखर उन्हाळा होत असतां त्याला वर्षाकाळ असें नांव देण्याइतकीं अप्रबुद्ध तर निश्चित नव्हतीं. तेव्हां त्या काळाचा निर्णय करावयाचा तर वरील कालाचा आश्रय करणें भाग आहे.

आतां ही योजना कां करण्यांत आली म्हणजे त्या योगानें साध्य काय साधलें तें पाहूं. सुधारणेसंबंधीं योजना ज्याप्रमाणें आम्हीं ठरविली त्याप्रमाणें हेंहि कल्पनेनें ठरवावयाचें आहे. सौरमानाशीं मेळ करण्याकरितां प्रतिवर्षीं १२ दिवस अधिक धरण्याची प्रथा फार प्राचीन काळीं होती, व हे बारा दिवस संपून नव वर्षाचे प्रारंभीं प्रथम आर्द्रावर व मग मृगांवर वृष्टि होऊं लागे, व तेव्हांच वर्षारंभ धरीत पण वृष्टीवरची ही वर्षारंभ योजना अनिश्चित स्वरूपाची असल्यामुळें रात्रि सर्वांत लहान होऊन मोठी होऊं लागली म्हणजे तीच वर्षारंभाची प्रथम रात्रि धरीत असें आम्हीं आग्रहायणींत दाखविलें आहे व तें येथें लक्षांत ठेवणें अवश्य आहे. प्रतिवर्षीं सर्वांत लहान

दिवस व रात्रि ठरवून त्यावर वर्षारंभ धरावयाची ही योजना सोयीची असली तरी तींत अनवस्था प्रसंग संभवनीय आहे. कारण हा वर्षारंभ पावसाळ्याचे प्रारंभींच, अर्थात् आकाश अभ्राच्छादित होऊन सूर्याचे उदयास्त काळ निश्चित करणें कठिण व्हावें हें साहजिक आहे. मग जेथें दिनमान नित्य कांहीं पळानीं वाढावें व उतरावें तेथें दिवसरात्रींचा लहानथोरपणा कसा निश्चित करणार ! अर्थात् ही अडचण वाटून प्रतिवर्षी वर्षारंभ दिवसाचा निश्चय करणें कठिण वाटलें तर त्यांत आश्चर्य काय ! तेव्हां ही अडचण टाळून वर्षारंभ तर साधावा यासाठीं सर्वांत लहान रात्रीची निवड करण्याची प्रथा सोडून देण्यात येऊन निरभ्र ऋतूंतील सर्वांत् लहान दिवसाची निवड करण्याची कल्पना पुढें आली असावी. येथें कृत्तिकांवर दिवस बदलला तरी भूल होण्याची भीति नाहीं हें उघड आहे. म्हणजे कृत्तिकांवर सर्वांत लहान रात्रि झाली असतां वर्षारंभ धरीत असत ती प्रथा यावेळीं बंद करण्यांत येऊन विशाखांवर दिवस सर्वांत लहान झाला असतां त्या रात्रीं वर्षारंभ धरण्याची प्रथा चालू करण्यांत आली. कार्तिकी पूर्णिमला रात्रीं त्यावेळीं हा

ा आला व हाच त्रिपुरवधाचा किंवा वर्षारंभाचा
ास होय.

[ श्रीक्षेत्र तिरुपति येथें भरलेल्या प्राच्यविद्यापरि-
च्या अधिवेशनाचे वेळीं या निबंधाचें संस्कृत रूपांतर
लेलें होतें. ]

---

ऑफप्रिन्ट्स